# वृद्ध थॉमस आणि पिटुकली परी





# वृद्ध थॉमस आणि पिटुकली परी

डोमनिक डेमेर्स

मराठी : अश्विनी बर्वे

वृद्ध थॉमसने अजून आपला शंभरवा वाढदिवस साजरा केला नव्हता पण तो खूपच म्हातारा होता. समुद्री पक्षी - सीगल आणि पाणकावळे यांच्यात तो अगदी एकटा राहत होता. आता तो मासे पकडायला जात नसे. म्हाताऱ्या थॉमसला सगळ्या जगाचा राग येत होता.एक दिवस तो संध्याकाळी समुद्रावर फिरत होता तेव्हा तो आकाशातल्या ताऱ्यांना आणि समुद्राच्या लाटांना शिव्या देत होता. तेव्हा त्याला एक पिटुकली मुलगी दिसली जी लाटांवर वाहत येत किनाऱ्यावर पोहचली.



मुलगी काडेपेटीपेक्षाही छोटी होती. तिचे कपडे फाटलेले होते आणि तिचं शरीर थंड पडलं होतं. वृद्ध थॉमसने तिला आपल्या मोठ्या हातात घेतलं. ती तिथं अगदी शांत पडून राहिली आणि वृद्ध थॉमसला तर तिचं वजन जाणवलंच नाही.

वृद्ध थॉमसचा पण होता की माणसांच्या बरोबर कोणताही संबधं ठेवायचे नाहीत. त्यांनी त्याला खूप दुःख दिलं होतं.पण त्याच्या हातात झोपलेली छोटी मुलगी खूपच पिटुकली होती. “जर मी हिला इथंच सोडून गेलो तर, “त्याने विचार केला, “तर समुद्राच्या लाटा तिला आपल्या बरोबर वाहून घेवून जातील.”



जेव्हा वेगवान वादळ त्याच्या झोपडीला धक्के देत होतं तेव्हा वृद्ध थॉमस पिटुकल्या मुलीला वाचवण्याचा प्रयत्न करत होता. त्याने मुलीला एका बशीत झोपवलं, आणि आपल्या शर्टाचा थोडासा तुकडा फाडून तिच्यासाठी पांघरूण तयार केलं. मग मोठ्या धीराने तिच्या तोंडात पाण्याचे थंब टाकू लागला.





तीन रात्री आणि तितकेच दिवस म्हाताऱ्याने तिची देखभाल केली. पिटुकली मुलीचे पिटुकले हृदय धडकत होतं पण तिचे डोळे बंद होते आणि तिचे हात-पाय निश्चल पडले होते. वृद्ध खूप अस्वस्थ होवू लागला होता.

जेव्हा सूर्य परत उगवला तेव्हा त्याला शिव्या देण्यासाठी वृद्ध थॉमस घराच्या बाहेर आला. पण त्या वृद्ध मासेमाऱ्याच्या लक्षात आले की त्याचा राग त्याला सोडून गेला आहे. आता तो एक वेगळाच माणूस झाला आहे. त्याने आपले डोळे बंद केले, खाऱ्या हवेत दीर्घ श्वास घेतला आणि समुद्र आणि सूर्य आणि हवेसाठी एक गुप्त प्रार्थना केली.

जेव्हा तो आत परत आला तेव्हा ती पिटुकल्या मुलीने आपले डोळे उघडले होते.

वृद्ध थॉमस परत मासे पकडू लागला. तो छोटे मासे घरी आणत असे, जे लांब आणि चमकदार होते आणि त्यांचे मांस खूप रुचकर होते. आणि पिटुकल्या मुलीसाठी तो छोटे, गोड फळं किनाऱ्यावरून शोधून शोधून आणत असे.

"एवढं खाऊन मी खूप मोठी होईल," पिटुकली मुलगी हसत विरोध करत म्हणायची. पण ती प्रसन्नतेने मासे आणि फळं खात असे.







जेव्हा वृद्ध थॉमस तिच्याकडे बघे तेव्हा तो प्रसन्न होत असे. कधी कधी तो विनाकारण विचार करत असे, “ही कोणी परी तर नाही?”

त्या संध्याकाळी निराशाजनक आणि वाईट विचार करण्याऐवजी, वृद्ध थॉमस लाटांचे संगीत ऐकू लागला आणि तारांच्या छायेत आपल्या पिटुकल्या परीला नाचतांना पाहू लागला. तो खूप प्रसन्न होता.

एक दिवस सकाळी जेव्हा वृद्ध थॉमस मासे पकडायला समुद्रावर गेला. एका जंगली कुत्र्याला पिटुकल्या मुलीचा वास बरोबर आला.

वृद्ध थॉमसने सोनेरी आणि चमकणाऱ्या पंखाचे छान मासे पकडले तेवढ्यात त्याला अशुभाची चाहूल लागली. त्याने मासे फेकले आणि पूर्ण ताकदीनिशी बोट किनाऱ्याकडे घेवून येवू लागला.



पिटुकली मुलगी जंगली कुत्र्याच्या गुरगुरण्याचा आवाज ऐकत होती. धाडस करून ती केबिनच्या एका शेल्फवर चढली आणि लपून बसली. जंगली कुत्र्याचा श्वास, त्याची खरखरीत जीभ आणि टोकदार दातांची कल्पना करून ती भीतीने थर थर कापत होती.





वृद्ध थॉमस जेवढा किनाऱ्याजवळ येत होता तेवढी त्याची भीती वाढत होती. त्याची पिटुकली परी संकटात होती.त्याचा पूर्ण विश्वास होता.

एक  जोरात उडी मारून कुत्र्याने धक्का दिला आणि केबिनचा दरवाजा उघडला. आत येताच त्याला  एका मोठ्या थाळ्यात मासा ठेवलेला दिसला. पण त्याला माश्यात रस नव्हता. त्या जंगली जानवराला तर पिटुकल्या मुलीचा अद्भुत सुंगंध वेडं करत होता.

कुत्र्याची शेपटी खाली होती आणि कान सरळ उभे होते आणि जबडा घुरघुरत होता. ते मुलीला सगळीकडे शोधत होता. तो मांडणीच्या खालची जमीन खोदू लागला. एका लांडग्या सारखा भयंकर आवाज त्याने आपल्या तोंडातून काढला.

अचानक त्याने उडी मारून मांडणीला धक्का दिला आणि त्याने ती खाली पडली.



वृद्ध थॉमसची नजर पहिल्यांदा त्या जंगली कुत्र्यावर पडली. मग पिटुकल्या परीवर पडली जी तुटलेल्या कपबश्या आणि भांड्यामध्ये पडलेली होती. आपल्या शौर्यावर विश्वास ठेवून तो त्या जंगली जानवरावर चालून गेला. जे रागाने वेडं झालं होतं.



पिटुकली मुलगी घाबरून बेशुद्ध पडली. तिला जेव्हा शुद्ध आली तेव्हा जंगली जानवर पळून गेले होते. वृद्ध थॉमस जमिनीवर पडला होता. त्याच्या शरीरावर त्या भयंकर कुत्र्याच्या दातांच्या आणि पंजाच्या कितीतरी खुणा होत्या. पिटुकली मुलगी वृद्ध व्यक्तीच्या छातीवर चढली, तिने त्याच्या छातीवर आपले कान लावले. वृद्ध थॉमसचे ह्रदय अजूनही धडधडत होते.



असाधारण कष्ट आणि प्रयत्न करून पिटुकल्या मुलीने वृद्ध थॉमसच्या जखमा साफ केल्या आणि त्याला पिण्यासाठी पाणी दिले. ती त्याच्यासाठी मासे आणि छोटेसे फळ सुद्धा घेवून आली.पण त्याला हे सगळं नको होतं.

त्याला माहित होतं तो आता मरणार आहे. आणि तो मरायला तयार होता. चंद्र आणि सूर्याला तो आता अपमानित करणार नव्हता. त्याची पिटुकली परी त्याच्याजवळ होती. ती आश्चर्यकारकरीतीने जीवंत होती आणि व्यवस्थित होती. वृद्ध थॉमस संतुष्ट होता.

संध्याकाळी मोठ्या मुश्किलीने तो हळूहळू समुद्रावर गेला. तिथं त्याला समुद्रात हरवून जायचं होतं. चमकदार पंखाच्या माशांमध्ये आणि सापांच्या मध्ये.

लवकरच एका उंच लाटेने त्याला आपल्या बरोबर वाहून नेलं. त्याचवेळी शेकडो समुद्री पक्ष्यांनी हृदय कापणारी मर्मभेदी आरोळी मारली.

हळूहळू समुद्र परत आला आणि किनाऱ्यावर बहुरंगी दगड, शंख शिंपले आणि समुद्री शेवाळाच्या रिबिनी आणि मोत्यांचे तुकडे सोडून गेला.



याशिवाय समुद्री तट पूर्णपणे विराण झाले होते. पिटुकली मुलगी गायब झाली होती.

